राज्य माहिती संचयिका STATE DATA BANK या वेबसाईटवर सामान्य प्रशासन विभाग, ११-अ शी संबंधित भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांची तसेच शासकीय सेवकांच्या विभागीय चौकशा व निलंबनाची माहिती भरण्याच्या सूचना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन परिपत्रक, क्रमांकः संकिर्ण-१०१४/प्र.क्र.४३/११-अ

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३० जून, २०१५

**वाचा**

१) **शासन निर्णय, क्रमांकः नियोजन विभाग, रामासं-२०१३/प्र.क्र.२२७/का.१४१७, दि.०७.०६.२०१४**
२) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.अहत १६१०/प्र.क्र.६४/१०/११अ, दि.०४.०२.२०११**
३) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही २०१४/प्र.क्र.२५ /२०१४ /१२, दि.०४.०२.२०१४**
४) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः अहत-१६१०/प्र.क्र.६४/१०/११अ, दि.१६.०१.२०१५**

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासनाच्या सर्व विभागांशी संबंधित अचूक व अद्ययावत सांख्यिकी माहिती एकत्रितरित्या उपलब्ध व्हावी म्हणून “राज्य माहिती संचयिका” निर्माण करण्यात आली आहे. ही संचयिका http://mahasdb.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर उपलब्ध आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांचा त्रैमासिक अहवाल विभागीय आयुक्त यांनी एकत्रितपणे जून,सप्टेंबर, डिसेंबर व मार्च महिन्याच्या ३० तारखेपर्यंत या विभागास पाठवावयाचा आहे. तसेच, संदर्भ क्र.३ येथील शासन परिपत्रकान्वये सेवाविषयक विविध विषयाची त्रैमासिक माहिती दर एप्रिल, जुलै, ऑक्टोबर व जानेवारीच्या ५ तारखेपर्यंत या विभागास पाठविण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यान्वये शासन निर्णयामधील अ.क्र.६ प्रशासकीय विभागांनी विभागीय चौकशी आणि अधिकारी/कर्मचारी यांच्या निलंबनाच्या प्रकरणांची (विवरणपत्र-फ) माहिती पाठवावयाची आहे. सदरहू दोन विषयांची माहिती राज्य माहिती संचयिका STATE DATA BANK (SDB) या वेबसाईटवर लिंक करण्यात आली आहे. ही माहिती प्रशासकीय सोयीसाठी व जनतेला उपलब्ध करुन देण्याकरिता STATE DATA BANK (SDB) यावर उपलब्ध करणे व माहिती ठेवण्यासाठी प्रशासकीय विभागांना सुचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक-

उपरोक्त प्रस्तावनेतील बाबी विचारात घेऊन या परिपत्रकान्वये पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१. शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, दि.४.२.२०११ व दि.१६.१.२०१५ मध्ये दिलेल्या सूचना विचारात घेऊन विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांचा त्रैमासिक अहवाल (Quarterly Consolidated Report of Committee on Corruption Eradication /Control ) विभागीय आयुक्त यांनी त्यांची व त्यांच्या अधिपत्याखालील जिल्हा व तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांची माहिती एकत्रितपणे राज्य माहिती संचयिका यामध्ये जून,सप्टेंबर, डिसेंबर व मार्च महिन्याच्या ३० तारखेपर्यंत भरण्याची दक्षता घ्यावी. माहिती संचयिका यामध्ये माहिती भरण्यासाठी या शासन परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रात login ID आणि Password उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. “विभागीय चौकशी आणि अधिकारी/कर्मचारी यांच्या निलंबनाची प्रकरणे” (Cases of Suspension and Departmental Enquiry of Government Servant) या विषयाची फ-१ ते फ-४ या विवरणपत्रातील माहिती सर्व प्रशासकीय विभागांनी, राज्य

माहिती संचयिका यामध्ये दर एप्रिल, जुलै, ऑक्टोबर व जानेवारीच्या ५ तारखेपर्यंत भरण्याची दक्षता घ्यावी. माहिती संचयिका यामध्ये माहिती भरण्यासाठी या शासन परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रात login ID आणि Password उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांची माहिती वेबसाईटवर भरण्यासाठी संबंधित अधिकारी यांच्या वापराकरिता, या सोबतच्या विवरणपत्रानूसार login ID व Password दिलेला असून विभागीय आयुक्त कार्यालयाने आवश्यकतेनुसार सदरहू Password बदलून घेण्याची कार्यवाही करावी.

४. मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून यापूर्वी ज्याप्रमाणे फ-१ ते फ-४ या विवरणपत्रातील माहिती एकत्रित भरुन या विभागास पाठविण्यात येत होती, त्याप्रमाणे आताही मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची(खुद्द) व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांची माहिती एकत्रित करुन भरण्याची दक्षता संबंधित प्रशासकीय विभागाच्या समन्वय/ आस्थापना अधिकारी यांनी घ्यावी. या सोबतच्या विवरणपत्रात login ID व Password दिलेला असून आवश्यकतेनुसार सदरहू Password बदलून घेण्याची कार्यवाही संबंधित प्रशासकीय विभागाच्या समन्वय अधिकारी/ आस्थापना अधिकारी यांनी करावी.

५. राज्य माहिती संचयिकेवरील माहिती शासकीय कामकाजासाठी वापर करण्यात येणार असल्यामुळे तसेच सदर माहिती जनतेच्या वापरासाठी खुली राहणार असल्याने ती काळजीपुर्वक भरण्याची व अद्ययावत ठेवण्याची दक्षता घ्यावी. या माहितीची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त/संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

६. प्रस्तुत माहिती भरताना अडचणी उद्भवल्यास सा.प्र.वि./कार्यासन ११-अ मधील अधिकारी/ कर्मचारी यांचेशी संपर्क साधावा.

ही माहिती भरताना तांत्रिक अडचणीसंदर्भात खालील ठिकाणी संपर्क साधावा.:-

State Data Bank Team,
अर्थ व सांख्यिकी संचालनालय,
नविन प्रशासकीय भवन
४ था मजला, मुंबई - ४०० ०३२
दूरध्वनी क्र.०२२-२२७९७०३१, २२७९७०२८, २२७९७०३३

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६३०१६४७०७९९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2015.06.30 16:52:35 +05'30'

**(व्यं.मा.भट)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

३) विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व नागपूर विभाग
४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
५) सह संचालक/उप संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय (सर्व)/ सर्व जिल्हे
६) उपसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, ४ था मजला, मुंबई- ४०० ०३२.
७) श्री.धवल, आय. टी.अभियंता, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, ४ था मजला, मुंबई- ४०० ०३२.
८) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, १९-अ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) निवडनस्ती